डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकीय पदांना दिनांक १/१/२००६ पासून विद्यापीठ अनुदान आयोगाच्या सुधारीत वेतनश्रेण्या लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. डीसीआय-२००९/(१३४/०९)विशि-४**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०००३२**
**दिनांक : २१ एप्रिल,२०११**

संदर्भ :- १) उ.व तं.शि.वि. शासन निर्णय क्र. डीसीआय-१०९९/(६४/९९)विशि-१, दि.०१/६/२००२
२) उ.व तं.शि शासन निर्णय क्र. एनजीसी-२००९/(२४३/०९)/विशि-१, दि १२ ऑगस्ट,२००९
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. डिसीआय/२००८/विविध प्रस्ताव/विशि-१/४४४९, दि. २८/१०/२००९

**प्रस्तावना :-** डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे ही संस्था दिनांक ६ ऑक्टोबर, १८२१ साली सुरु झाली आहे. ही संस्था देशातील ३ जुन्या संस्थापैकी एक आहे. १६ ऑगस्ट, १९३९ च्या मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार शासनाने या संस्थेच्या वेतन, वेतनेत्तर व विकास निधीच्या अनुदानाची संपूर्ण जबाबदारी स्विकारलेली आहे. या संस्थेत पुरातत्व शास्त्र, भाषा शास्त्र, संस्कृत व कोष शास्त्र या विभागांमध्ये एम.ए व पी.एच.डी चे पदव्युत्तर अभ्यासक्रम तसेच मुलभूत संशोधन केले जाते. त्यानुसार संस्थेच्या मुलभूत संशोधनाच्या व अध्यापनाच्या गरजा लक्षात घेऊन विविध शासन निर्णयान्वये ५३ शिक्षकिय पदे मंजूर करण्यात आली आहेत. त्यानुसार शासनाने या अभिमत विद्यापीठातील शिक्षकीय पदांना विद्यापीठ अनुदान आयोगाने शिफारस केलेल्या ५ व्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या वरील संदर्भीय क्र. १ मधील शासन निर्णयानुसार लागू करण्यात आल्या आहेत. त्यानुसार संस्थेतील शिक्षकीय पदांना देखील सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील सोबत जोडलेल्या प्रपत्र 'अ' मधील ४ संवर्गातील ५३ शिक्षकीय पदांना, सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एनजीसी-२००९/(२४३/०९)/युएनआय-१, दि १२ ऑगस्ट,२००९ मधील तरतूदी दिनांक १ जानेवारी, २००६ पासून लागू करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. या विभागाच्या नियंत्रणाखालील पारंपारिक विद्यापीठांना विविध आदेशानुसार जे लाभ देण्यात आलेले आहेत ते सर्व, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठास लागू करण्यात येत आहेत.

३. डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकीय पदांना सहावा वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या दि. ०१/०१/२००६ पासून लागू केल्यानंतर, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि. ०१/०१/२००६ ते ३१/०३/२०१० पर्यंतच्या वाढीव रकमेच्या ८०% इतक्या रकमेची प्रतिपूर्ती करण्याबाबतचा प्रस्ताव विद्यापीठ अनुदान आयोगास सादर करावा.

४. संचालक, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे यांनी संबंधित कर्मचाऱ्यांची वेतन निश्चिती दिनांक १ जानेवारी, २००६ पासून, दि १२ ऑगस्ट,२००९ च्या शासननिर्णयातील तरतुदीनुसार करावी व त्याला संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांची मान्यता घ्यावी.

५. सुधारीत वेतन श्रेणी स्विकारण्यासाठी विद्यापीठातील कर्मचाऱ्यांनी या आदेशाच्या निर्गमनाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या कालावधीत विकल्प द्यावा.

६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सुधारीत वेतन श्रेणीवरील खर्च सन २०११-१२ मधील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५७१/सेवा-९, दि. ०९/०९/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०४१९१११२४०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा. स. अटक)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव
४) मा. सचिव (उ.व तं.शि) यांचे स्वीय सहायक
५) संचालक, डेक्कन कॉलेज, पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे
६) निवड नस्ती

प्रपत्र- अ

## डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था
## पुणे - ४११ ००६.

### सहाव्या वेतन आयोगानुसार शिक्षकीय पदांच्या सुधारित वेतनश्रेणीचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | एकूण पदांची संख्या | सध्याची वेतनश्रेणी | सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनश्रेणी | ग्रेड पे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | प्राध्यापक / सर्वसाधारण संपादक / संपादक /सहसंपादक | १० | १६४००-२२४०० | ३७४००-६७००० | १००००/- |
| | प्राध्यापक (Under CAS) | | १६४००-२२४०० | ३७४००-६७००० | १००००/- |
| २. | प्रपाठक (सहयोगी प्राध्यापक) | १७ | १२०००-१८३०० | १५६००-३९१०० | ८०००/- |
| | (Under CAS) | | १२०००-१८३०० | ३७४००-६७०००<br>(after three year) | ९०००/- |
| ३. | व्याख्याता /उपसंपादक / संशोधन सहयोगी | २५ | ८०००-१३५०० | १५६००-३९१०० | ६०००/- |
| | वरिष्ठश्रेणी (Under CAS) | | १००००-१५२०० | १५६००-३९१०० | ७०००/- |
| ४. | ग्रंथपाल | १ | ६५००-१०५०० | १५६०० - ३९१०० | ६०००/- |
| | **एकूण** | **५३** | | | |

(रा. स. अटक)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन